केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सर्वसाधारण वर्गवारी (General) करीता Infrastructure & Maintenance साठी सन २०१८-१९ मधील राज्य हिश्श्यापोटी रु. १६४७४.२९ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०९१८/प्र.क्र.५१५/आ-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक: ६ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-**

आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ रा.हि./५०३७८-३८४/२०१८-१९, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व गरजू प्रकारच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानातील राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता सर्वसाधारण वर्गवारीकरीता (General) सन २०१८-१९ साठी Infrastructure & Maintenance करीता राज्य हिश्श्यापोटीचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रमासाठी सर्वसाधारण वर्गवारीकरीता (General) करीता सन २०१८-१९ साठी Infrastructure & Maintenance या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता राज्य हिश्श्यापोटी रु. १६४७४.२९ लक्ष (रु. एकशे चौसष्ट कोटी चौऱ्याहत्तर लक्ष एकोणतीस हजार फक्त) अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर योजनेसंदर्भात येणारा खर्च (०१) (१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा) (२२१०५२४६) - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दिनांक २ एप्रिल, २०१८ सोबतच्या परिशिष्टामधील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करणे आणि यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटी, महाराष्ट्र या बचत खात्याच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत, सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे, सदर प्रस्तावात वस्तू खरेदीचा प्रस्ताव तसेच भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही, सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरिल निधी राज्य

आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार आहे त्या कार्यक्रम प्रमुखांना बंधनकारक राहील.

५. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/ प्र.क्र.८५/ २०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०६१४४५४८०२१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.12.06 15:45:15 +05'30'

**( सु. अ. पेडगांवकर )**
**अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई .
११. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४. निवडनस्ती ( आरोग्य -७) .